**स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेडच्या इमारतीच्या बांधकामासाठी व विद्यापीठाच्या विकासासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्रशिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांक: आरएमयु - २००९/(१६९/०९)/विशि-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ४ मार्च, २०१०.

पहा :- १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. आरएमयु- २००८/(१५१/०८)/ विशि-२, दि. २० नोव्हेंबर, २००८
२) शासन निर्णय क्र. आरएमयु-२००८/(१५१/०८)/विशि-२, दि. ४.३.२००९
३) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण क्र. युएनआय/यो.या.प्र./नांदेड/ विशि(६)/२००९/६८८३, दि. १.२.२०१०

**प्रस्तावना** : स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ नांदेडच्या, लातूर उपकेंद्राच्या प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाच्या खर्चास रु. १०,३२,७३,०००/- इतक्या अंदाजपत्रकीय खर्चास व आराखडयास प्रशासकीय/सचिव समितीची मान्यता अनुक्रमे दि. २०.११.२००८ व दि. १० फेब्रुवारी, २००९ या शासन निर्णयान्वये देण्यात आलेली आहे. उपरोक्त प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने रुपये १.०० कोटी इतका निधी सन २००८-२००९ या आर्थिक वर्षात दि. ४ मार्च, २००९ च्या शासन निर्णयान्वये यापूर्वीच वितरीत करण्यात आलेला आहे.

सन २००९-१० या आर्थिक वर्षातील लेखाअनुदानामध्ये स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा नांदेड येथील विद्यापीठाच्या इमारतीच्या विकासासाठी रु. १६६.६७ लक्ष रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** प्रस्तावनामध्ये नमूद केलेल्या स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठाच्या, नांदेड येथील विद्यापीठाच्या इमारतीच्या विकासासाठी शिक्षण संचालक, उच्च शिक्षण यांनी संदर्भीय पत्र क्र. ३ अन्वये प्रस्तावित केले आहे. त्यानुसार सदर रक्कम रु. १६६.६७ लक्ष एवढा निधी स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठाच्या नांदेड येथील विद्यापीठाच्या विकासाच्या खालील कामाकरिता वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

(रुपये लाखात)

| अ.क्र. | योजनेचे नाव | प्रशासकीय मान्यता (रुपये) | सन २००८-०९ मध्ये दिलेले अनुदान (रुपये) | प्रशासकीय मान्यतेतील उर्वरीत निधी (रुपये) | प्रस्तावीत खर्च (रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| १. | केंद्रिय परीक्षा मुल्यांकन केंद्राचे इमारत बांधकाम व साधनसामुग्री खरेदीसाठी | २.२०३४ कोटी | २.०० कोटी | २०,३४,०००/- | २०,३४,०००/- |
| २. | ग्रंथालय | ९.१४९६ कोटी | ३.०० कोटी | ६.१४९६ कोटी | १,४६,३३,०००/- |
| | | | | | **एकुण प्रस्तावीत खर्च रु. १,६६,६७,०००/-** |

२. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल -२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोजन प्रमाणपत्र (Utilisation Certificate)संबंधितांना योग्य वेळी सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर खर्च " मागणी क्रमांक - डब्ल्यु-२ प्रधानशिर्ष २२०२,सर्वसाधारण शिक्षण ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण १०२, विद्यापीठांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, - (००) (१९) नांदेड येथील स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठाचा विकास (२२०२ ३५४८), ३१ सहाय्यक अनुदाने " या लेखाशिर्षाखाली सन २००९-१० मधील मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग पहिला उप विभाग तीन मधील अ.क्र. ४- नियम क्रमांक २७(२) (अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये आणि वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि. १५ मे, २००९ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१००३०३१७२५१२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

( रा. गो. जाधव )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे उपसचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) कुलगुरु, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.
४) कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / लेखापरीक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
७) सहसंचालक, उच्च शिक्षण, नांदेड विभाग, नांदेड.
८) जिल्हाकोषाधिकारी, नांदेड.
९) जिल्हाकोषाधिकारी, पुणे.
१०) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
११) वित्त विभाग,(व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१२) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) मा. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१४) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१५) अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६) निवड धारिका विशि - २